**केंद्र पुरस्कृत कृषी उन्नती योजनातंर्गत परंपरागत कृषि विकास योजनाकरिता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय निधीतुन अनुसुचित जाती प्रवर्गासाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- योजना ३३२१/ प्र.क्र. १२९/१-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०००३२

दिनांक : १० डिसेंबर, २०२१

**वाचा :**

१) केंद्र शासनाने DAC Website: agricoop.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या परंपरागत कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सुचना.

२) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/पीकेव्हीवाय/पुर्न/१६५१६/२०२१, दिनांक २४.०५.२०२१

३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक ०६.०४.२०२१

४) केंद्र शासनाचे पत्र क्र. २-१/२०२०-Org.Fmg, (FIS/८३२६९), दि.०३.०५.२०२१.

५) केंद्र शासनाचे पत्र क्र.२०१५/१५-९ -Org.Fmg, ५९०६६/(FIS), दि.१०.०५.२०२१.

६) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१

७) कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: योजना ३३२१/प्र.क्र.६०/१-अे, दि.०६/०८/२०२१

८) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२१/प्र.क्र.१५/ अर्थसंकल्प (विघयो), दिनांक १२.११.२०२१.

**प्रस्तावना -:**

परंपरागत कृषी विकास योजनेअंतर्गत सन २०१७-१८ मध्ये ३२६ गट, सन २०२०-२१ मध्ये ३५० गट आणि ४ आकांक्षीत जिल्ह्यांमध्ये २० गट स्थापन करून योजना राबविण्यात येत आहे. योजनेअंतर्गत एकदा निवड केलेल्या गट/लाभार्थीस तीन वर्षे लाभ देण्यात येतो.

सन २०२०-२१ मध्ये गट निहाय अखर्चित राहिलेल्या निधीचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

**(रुपये लाखात)**

| गट (संख्या) | लेखाशिर्ष २४०१ बी २०३<br>केंद्र हिस्सा (रु लाख) | लेखाशिर्ष २४०१ बी २१२<br>राज्य हिस्सा (रु. लाख) | एकुण (रु लाख) |
|---|---|---|---|
| २० | १२.१२ | ८.०८ | २०.२० |
| ३२६ | १८३.७९ | १२२.५३ | ३०६.३२ |
| ३५० | ५७७.२८ | ३८४.८५ | ९६२.१३ |

वरीलपैकी २० गटांचा अखर्चित निधी केंद्र शासनाच्या दिनांक ०३.०५.२०२१ च्या पत्रान्वये तसेच ३२६ गट व ३५० गटांचा अखर्चित निधी केंद्र शासनाच्या दिनांक १०.०५.२०२१ च्या पत्रान्वये केंद्र शासनाकडून पुर्नजिवित (Revalidate) करुन दिलेला आहे.

सन २०२०-२१ मध्ये केंद्र शासनाकडून वितरीत झालेला परंतू कोविड २०१९ च्या पार्श्वभूमीवर अखर्चित केंद्र हिस्स्याचा निधी व त्यास अनुसरुन राज्य हिस्स्याचा अनुसूचित जाती प्रवर्गाचा निधी पुढीलप्रमाणे आहे.

**(रुपये लाखात)**

| **योजनेचे नाव** | **गट (संख्या)** | **लेखाशिर्ष २४०१ बी२०३** | **लेखाशिर्ष २४०१ बी२१२** | **एकुण** |
|---|---|---|---|---|
| | | **केंद्र हिस्सा** | **राज्य हिस्सा** | |
| परंपरागत कृषी विकास योजना | २० | १.५१४७० | १.००९८० | २.५२४५० |
| | ३५० | ५३.०१४५० | ३५.३४३०० | ८८.३५७५० |
| | ३२६ | १३.७८४२५ | ९.१८९७५ | २२.९७४०० |
| **एकूण** | **६९६** | **६८.३१३४५** | **४५.५४२५५** | **११३.८५६००** |

**सन २०२१-२२ ची मंजूर अर्थसंकल्पीय तरतूद आणि निधी मागणी पुढीलप्रमाणे आहे-**

**(रुपये लाखात)**

| **तपशिल** | **लेखाशिर्ष २४०१ बी२०३** | **लेखाशिर्ष २४०१ बी२१२** | **एकुण** |
|---|---|---|---|
| | **केंद्र हिस्सा** | **राज्य हिस्सा** | |
| मंजूर अर्थसंकल्पीय तरतूद | २२५.०० | १५०.०० | ३७५.०० |
| निधी मागणी | ६८.३१३४५ | ४५.५४२५५ | ११३.८५६०० |

२. केंद्र पुरस्कृत कृषि उन्नती योजना परंपरागत कृषि विकास या योजनेसाठी अनुसूचित जाती घटकांकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २४०१-पीक संवर्धन, (००) (७८९)-अनुसूचित जाती उपयोजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना (०१) (१३) कृषि उन्नती योजना- परंपरागत कृषि विकास योजना केंद्र हिस्सा ६० टक्के (२४०१ B २०३) या लेखाशिर्षाखाली रु.२२५.०० लाख, (०१ (१४) कृषि उन्नती योजना- पंरपरागत कृषि विकास योजना राज्य हिस्सा ४० टक्के (२४०१ B२१२) या लेखाशिर्षाखाली रु.१५०.०० लाख इतका नियतव्यय सामाजिक न्याय विभागाकडे अर्थसंकल्पीय तरतुदीनुसार उपलब्ध आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधिन दिनांक ०६.०४.२०२१ व दिनांक २४.०६.२०२१ रोजीच्या निर्णयान्वये राज्यात कोरोना विषाणुमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता निधी वितरणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली आहे. तसेच वित्त विभागाने कार्यक्रमांतर्गत योजनांच्या ६० टक्के मर्यादेत खर्चासाठी नियोजनात्मक सूचना केलेल्या आहेत. तसेच केंद्र पुरस्कृत योजनांच्यामागील वर्षामधील निधी वितरणाकरीता वित्त विभागाची सहमती घेणे अनिवार्य केले आहे. या अनुषंगाने कृषि उन्नती योजनेअंतर्गत परंपरागत कृषि विकास योजना या योजनेसाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या केंद्र हिस्सा रु.२२५.०० लाख व राज्य हिस्सा रु.१५०.०० लाख इतक्या तरतूदीमधून कोविड १९ च्या महामारीमुळे सन २०२१-२२ या वित्तिय वर्षात होणाऱ्या अर्थव्यवस्थेवरील परिणामाबाबत वित्तिय उपाययोजना करण्याबाबत वित्त विभागाने शासन निर्णय क्र.अर्थसं २०२१ प्र.क्र.४८/अर्थ ३ दि.२४ जून २०२१ रोजी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील कार्यक्रमांतर्गत योजनांसाठी २०२१-२२ च्या

अर्थसंकल्प निधीच्या ६०% निधी उपलब्धतेच्या मर्यादेत राहून विभागाने केंद्र हिस्सा लेखाशिर्ष (२४०१ बी२०३) अंतर्गत रु.६८.३१३४५ लाख व राज्य हिस्सा लेखाशिर्ष (२४०१ बी २१२) अंतर्गत रु.४५.५४२५५ लाख असा एकुण रु.११३.८५६ लाख इतका निधी वितरीत करण्याची बाब विचाराधीन होती. तथापि वित्त विभागाने केंद्र हिस्सा (२४०१ बी२०३) अंतर्गत रु.६८.३१ लाख व राज्य हिस्सा (२४०१ ब २१२) अंतर्गत रू.२४.५४ लाख इतका निधी वितरीत करण्यास सहमती दर्शविलेली आहे.

या अनुषंगाने या विभागाच्या प्रस्तावास वित्त विभागाने उपरोक्त प्रमाणे दिलेल्या सहमतीस अनुसरुन सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने शासन निर्णय क्र.बीजीटी २०२१/प्र.क्र.१५/ अर्थसंकल्प (विघयो), दिनांक १२ नोव्हेंबर, २०२१ अन्वये सन २०२०-२१ या वर्षातील अखर्चित निधी करीता उपरोक्त सन २०२१-२२ करीता अर्थसंकल्पीत तरतूदीतून (०१) (१३) कृषि उन्नती योजना- परंपरागत कृषि विकास योजना केंद्र हिस्सा ६० टक्के (२४०१ B२०३) या लेखाशिर्षाखाली रु.६८.३१ लाख तसेच (०१) (१४) कृषि उन्नती योजना- परंपरागत कृषि विकास योजना राज्य हिस्सा ४० टक्के (२४०१ B२१२) या लेखाशिर्षाखाली रु.२४.५४ लाख असा एकूण रु.९२.८५ लाख इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव, कृषि व पदुम विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान केली आहे. तसेच सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे.

सन २०२०-२१ या वर्षातील अखर्चित निधी करीता उपरोक्त सन २०२१-२२ करीता अर्थसंकल्पीत तरतूदीतून (०१) (१३) कृषि उन्नती योजना- परंपरागत कृषि विकास योजना केंद्र हिस्सा ६० टक्के (२४०१ B२०३) या लेखाशिर्षाखाली रु.६८.३१ लाख तसेच (०१) (१४) कृषि उन्नती योजना- परंपरागत कृषि विकास योजना राज्य हिस्सा ४० टक्के (२४०१ B२१२) या लेखाशिर्षाखाली रु.२४.५४ लाख असा एकूण रु.९२.८५ लाख इतका निधी आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०२०-२१ या वर्षातील अखर्चित निधी करीता सन २०२१-२२ या चालू वर्षाच्या अर्थसंकल्पीत तरतूदीतून (०१) (१३) कृषि उन्नती योजना- परंपरागत कृषि विकास योजना, केंद्र हिस्सा ६० टक्के (२४०१ B२०३) या लेखाशिर्षाखाली रु.६८.३१ लाख तसेच (०१) (१४) कृषि उन्नती योजना- परंपरागत कृषि विकास योजना राज्य हिस्सा ४० टक्के (२४०१ B२१२) या लेखाशिर्षाखाली रु.२४.५४ लाख असा एकूण रु.९२.८५ लाख इतका निधी आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्यात येत आहे.

**२. सदर योजना राबवितांना खालील अटी व शर्तींचे पालन करण्यात यावे.**

१) सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनांनुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्ती नुसार राबविण्यात यावी.

२) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवुन सदर खर्चाचे लेखापरिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र व राज्य शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावेत.

३) योजनेच्या वेगवेगळया बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र व राज्य शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

४) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुंरुवातीला अखर्चित रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमुद करण्यात यावे. जेणेकरुन पारदर्शी स्वरुपात रकमा विचारत घेता येतील व संदिग्धता राहणार नाही.

५) कोणत्याही परिस्थितीत मंजुर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

६) वरील योजनेचा निधी अनुसुचित जाती व नवबौद्ध प्रवर्गासाठीच खर्च करण्यात यावा तसेच केंद्र हिस्स्याच्या प्रमाणातच राज्य हिस्सा खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

७) कोरोनामुळे राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरुपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रण अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा.

८) सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

९) नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

३. सदर निधी खर्च करतांना विहीत कार्यपध्दती अनुसरुन सर्व्र वित्तिय कायदे / टेंडर नियमावली व नियमांचे / प्रक्रियेचे/ वित्तीय अधिकारांच्य मर्यादेत / P.W.D. / मॅन्युअलचे अधिन राहून / C.V.C तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/ प्रचलित शासन निर्णय / नियम / परिपत्रक / तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावली नुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन निर्णय /अधिकाराचा भंग होणारी नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी क्षेत्रिय कार्यालयाची राहिल. त्यांनी या शासन निर्णयांन्वये वितरीत केलेला सर्व निधी सर्व जिल्ह्यांना पी.एफ.एम.एस (PFMS) प्रणालीद्वारे वितरीत करावयाची कार्यपध्दती बंधनकारक राहिल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना नियंत्रण अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक ०६.०४.२०२१ व शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर योजनेकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणुन व सहायक संचालक लेखा-१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक ०६.०४.२०२१ व दिनांक २४.०६.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग तसेच कृषि व पदुम विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.७९७/ व्यय-१४ दिनांक ३०.०८.२०२१ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२११२१०१८०३२६४४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, serialNumber=ccbe80fcc6b64503b4e8b1269bd88d631f3f3c2bef6e1ca70cc9a4e30954011f, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2021.12.10 18:09:50 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
४. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर .
७. सहाय्यक संचालक, लेखा -१, कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. अवर सचिव (व्यय-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प (विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती (कार्यासन १-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.